**अर्थ व सांख्यिकी संचालनालय जिल्हा सांख्यिकी कार्यालय, सिंधुदूर्ग, नंदुरबार, धुळे व उस्मानाबाद कार्यालयाचे फर्निचर व इलेक्ट्रीक नुतनीकरण कामाकरीता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : असांसं १३१६/११५२/प्र.क्र. १६४/का-१४१७**
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २१ मार्च, २०१७

**प्रस्तावना:**

अर्थ व सांख्यिकी संचालनालय, जिल्हा सांख्यिकी कार्यालय, सिंधुदूर्ग, नंदुरबार, धुळे व उस्मानाबाद कार्यालय, संबंधित जिल्ह्यांच्या प्रशासकीय इमारतीत कार्यरत आहेत. सदर कार्यालयातील फर्निचर व इलेक्ट्रीक नुतनीकरण करण्याच्या दृष्टीने कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कुडाळ, नंदुरबार, धुळे आणि उस्मानाबाद यांनी यासाठी तयार केलेल्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय यांना जिल्हा सांख्यिकी कार्यालय, सिंधुदूर्ग, नंदुरबार, धुळे व उस्मानाबाद या कार्यालयाच्या नुतनीकरणासाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे येणा-या रुपये ८८,१३,९९४/- (रुपये अठ्याऐंशी लाख तेरा हजार नऊशे चौ-यान्नव फक्त) इतक्या अंदाजित खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | जिल्हा सांख्यिकी कार्यालय, सिंधुदुर्ग | ३१,३९,५७४/- |
| २ | जिल्हा सांख्यिकी कार्यालय, नंदुरबार | २६,८१,९५०/- |
| ३ | जिल्हा सांख्यिकी कार्यालय, धुळे | १८,६८,८२१/- |
| ४ | जिल्हा सांख्यिकी कार्यालय, उस्मानाबाद | ११,२३,६४९/- |
| | **एकूण** | **८८,१३,९९४/-** |

२. सदरचा खर्च मागणी क्र. ओ - ९, ३४५४ गणना, सर्वेक्षण व सांख्यिकी, ०२ सर्वेक्षण व सांख्यिकी, ११२ आर्थिक सल्ला व सांख्यिकी, (०३) (११) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे बळकटीकरण (३४५४०४४७) (योजनांतर्गत योजना), १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखालील सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या लेखाशीर्षाखाली होणा-या खर्चासाठी संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय हे नियंत्रक अधिकारी असतील व जिल्हा सांख्यिकी अधिकारी, सिंधुदूर्ग, नंदुरबार, धुळे व उस्मानाबाद हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची

माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय यांची राहील.

४. सदर शासन निर्णय (अ) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/ विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग दोन अ. क्र. ३५, नियम क्र. ८९ अन्वये प्रशासनिक विभागाला असलेले अधिकार (आ) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग पाच, परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये निवासेत्तर इमारतीमध्ये अस्तित्वात असलेल्या विद्युत संच मांडण्यामध्ये भर घालणे किंवा फेरबदल करणे किंवा नवीन स्वरूपाचा मूळ विद्युत संच उभारणीस मंजूरी देणे याबाबत विभाग प्रमुखाला असलेल्या अधिकारास अनुसरून तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४८६/१६/इमा-३ दिनांक ११-११-२०१६, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४०/१७/को.प्र.५ दिनांक १७-२-२०१७ अन्वये प्राप्त सहमती / मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रशासकीय मान्यता देण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने विहित केलेल्या अटीचे व सूचनांचे तसेच खालील अतिरिक्त अटींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदरील काम जर अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास त्यात ४ टक्के सेंटेज चार्जेसची तरतूद मिळविण्यात यावी.

अ. दरसूचीबाह्य दरांना अधिक्षक अभियंता यांची मंजूरी घेवून सविस्तर अंदाजपत्रक व नकाशे तयार करण्यात यावेत.

ब. काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित अधिक्षक अभियंता व मुख्य अभियंता यांच्याकडून स्वाक्षांकीत करुन घ्यावे.

क. काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

ड. प्रस्तुत प्रकरणी चार जिल्हयांच्या ठिकाणाच्या जिल्हा सांख्यिकी कार्यालयामध्ये फर्निचरचे काम करणे प्रस्तावित आहे. प्रस्तावित कामामध्ये धुळे व उस्मानाबाद या ठिकाणच्या कामामध्ये उपअंदाजपत्रके आहेत. या सर्व उप अंदाजपत्रकांची मिळून प्रत्येक जिल्हानिहाय एकच निविदा काढून काम हाती घेण्यात यावे.

इ. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

फ. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

ग. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही - २०१३/ प्र.क्र. १७७ / तां.क. १ दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२११२२०३३६६१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2017.03.21 12:23:41 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई-५१
६) सह संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण विभाग, बेलापूर, नवी मुंबई / नाशिक / औरंगाबाद
७) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, सिंधुदूर्ग / नंदुरबार / धुळे / उस्मानाबाद
८) जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय, सिंधुदूर्ग / नंदुरबार / धुळे / उस्मानाबाद
९) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-३) मंत्रालय, मुंबई-३२
१०) नियोजन विभाग (का-१४२४ / १४२६ / १४२७), मंत्रालय, मुंबई-३२
११) निवड नस्ती (का-१४१७).